विद्युत निरीक्षक यांच्या बदल्या /नियुक्त्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग

शासन आदेश क्रमांक :बदली -२०१५/प्र.क्र.३८८/ऊर्जा-२
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३१ जुलै, २०१५.

**आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतूदीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने, सार्वजनिक सेवेच्या हितार्थ प्रशासकीय कारणास्तव उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाअंतर्गत मुख्य विद्युत निरीक्षक यांच्या नियंत्रणाखालील श्री. अख्तर हुसेन अन्सारी, विद्युत निरीक्षक, जालना यांच्या बदलीचे आदेश देण्यात येत आहेत. बदलीनंतर त्यांची नियुक्ती विद्युत निरीक्षक, भंडारा येथे श्री.विनय वसंत खापर्डे यांच्या बदलीमुळे रिक्त होणाऱ्या पदावर करण्यात येत आहे.

२. मुख्य विद्युत निरीक्षक,मुंबई यांनी बदली झालेल्या अधिकाऱ्याला त्याच्या नवीन नियुक्तीच्या ठिकाणी त्वरित कार्यभार घेता यावा म्हणून आवश्यक ती स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन सध्याच्या पदभारातून तात्काळ पदमुक्त करावे व त्यांना नवीन नेमणुकीच्या जागी ताबडतोब रुजू होण्यास सांगावे. बदली झालेल्या अधिकाऱ्यास रजा मंजूर करु नये.

३. श्री. अख्तर हुसेन अन्सारी यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरित स्वीकारावा तसेच त्यांनी अनधिकृतरित्या रजेवर जावू नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक:सीडीआर-१०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०/८/१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. सदर परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना लक्षात घेता, त्यांनी बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील, याची नोंद घ्यावी.

४. श्री. अख्तर हुसेन अन्सारी यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी त्वरित हजर रहावे व पदभार स्विकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५०७३११७४१५६५०१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sanjay Sharad Sirsikar

Digitally signed by Sanjay Sharad Sirsikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries Energy & Labour, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Sharad Sirsikar
Date: 2015.07.31 17:45:05 +05'30'

**( सं.श.शिरसीकर )**
**शासनाचे सहसचिव**

**प्रति,**

श्री. अख्तर हुसेन अन्सारी, विद्युत निरीक्षक

**प्रत,**

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा. मंत्री(ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर
महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
जिल्हा कोषागार अधिकारी , जालना / भंडारा
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
मुख्य विद्युत निरीक्षक,उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,चेंबूर, मुंबई-७१
अधिक्षक अभियंता , मुंबई प्रादेशिक विद्युत निरीक्षण मंडळ, मुंबई.
अवर सचिव (रोखशाखा), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
अवर सचिव (ऊर्जा-३), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
कक्ष अधिकारी, (प्रशासन-२), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती (ऊर्जा-२), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.